राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणामधील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन तसेच कार्यालयीन खर्चासाठी आकस्मिकता निधी मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीएसएल २०१४/प्र.क्र.७९/१३ स**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.

तारीख: २० नोव्हेंबर, २०१४.

वाचा :

१) **शासन निर्णय क्रमांकः सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, सववि ३११३/प्र.क्र.७२/आस्था-१, दि. ३१.१०.२०१३.**

२) **शासन निर्णय क्रमांकः सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, सीएसएल २०१४/प्र.क्र.७९/१३ स, दि. ६.०८.२०१४ व शुध्दीपत्रक, दि.१६.१०.२०१४.**

३) **सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.रासनिप्रा/वेतन व भत्ते, कार्या.खर्च तरतूद/ ४५१/२०१४, दि.३.०९.२०१४.**

प्रस्तावना :

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६०, दि.१३.०८.२०१३ ( सुधारणा ) अधिनियमातील कलम ७३ कब नुसार राज्यातील सहकारी संस्थांच्या निवडणूका स्वतंत्र यंत्रणेद्वारे घेण्यासाठी राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाचे गठण करण्यात आले आहे. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणासाठी शासन निर्णय, दि.३१.१०.२०१३ अन्वये ४४ पदांना ( अधिकारी / कर्मचारी ) मान्यता देण्यात आली आहे. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण हि अधिनियमातील तरतूदींनुसार वैधानिक यंत्रणा असून प्राधिकरणावर आयुक्त म्हणून भा.प्र.से. मधील सेवानिवृत्त अधिकारी यांची दि.१६.०५.२०१४ च्या अधिसूचनेद्वारे नियुक्ती करण्यात आली आहे. सदर प्राधिकरणासाठी शासन निर्णय,दि. ६.०८.२०१४ अन्वये " नियंत्रक अधिकारी " व " आहरण व संवितरण अधिकारी " घोषित करण्यात आले आहेत. प्राधिकरणाच्या कामासाठी नियुक्त करण्यात आलेले अधिकारी / कर्मचारी यांचे नोव्हेंबर २०१४ अखेरपर्यंतचे वेतन व भत्ते तसेच अन्य कार्यालयीन खर्चासाठी आकस्मिकता अग्रिम निधी मंजूर करणेबाबत प्रस्ताव विचाराधिन होता.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयान्वये राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणातील अधिकारी / कर्मचारी यांचे नोव्हेंबर २०१४ अखेरपर्यंतचे वेतन व भत्ते तसेच अन्य कार्यालयीन खर्चासाठी रु.२१,५०,०००/- (रु.एकवीस लाख पन्नास हजार फक्त ) एवढ्या आकस्मिकता अग्रिम निधीस मान्यता देत आहे. सदर

आकस्मिकता निधी अग्रिम वित्त विभाग, शासन ज्ञापन क्रमांक : आकनि २०१४/५/ अर्थसंकल्प-१३, दि.२० नोव्हेंबर, २०१४ अन्वये मंजूर करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक ८००० ६९२५ असा आहे. या प्रित्यर्थचा खर्च संगणकीय अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीनुसार करण्यात यावा.

२. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या रु. २१,५०,०००/- अग्रिम धनाचे संदर्भात सहायक सहकारी निवडणूक अधिकारी, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे -१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे - १ यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. आहरण व संवितरण अधिकारी यांचे लक्ष महाराष्ट्र आकस्मिकता निधी नियम क्र. ६, ८ आणि १२ कडे वेधण्यात येत आहे. तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांनी वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक : सीएनएफ १०८३/१४०/ अर्थसंकल्प-३, दि.२६.०४.१९८३ आणि वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक : सीएनएफ १०८६/१५३/ अर्थसंकल्प-३, दि.२८.०८.१९८६ च्या परिच्छेद २ ( १ ) मध्ये दर्शविलेल्या सूचनांच्या संदर्भात खालील बाबींचे अनुपालन करावे.

अ) आकस्मिकता निधी अग्रिमातून काढण्यात येणा-या प्रत्येक रकमेच्या देयकावर वरच्या कोपऱ्यात आकस्मिकता निधी हा शब्द लिहावा, तसेच आकस्मिकता निधी मंजूर केलेल्या वित्त विभाग, शासन ज्ञापन क्रमांक : आकनि २०१४/५/ अर्थसंकल्प-१३, दिनांक २० नोव्हेंबर, २०१४ अन्वये मंजूर असे प्रत्येक देयकावर “ **लाल शाईने** ” लिहावे.

ब) आकस्मिकता निधीतून मंजूर केलेला रु.२१,५०,०००/- इतका अग्रिम धन दिनांक ६ डिसेंबर, २०१४ पर्यंत पूर्णत: खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

क) आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या खर्चाचा हिशोब वेगळा ठेवून त्यासंबंधीच्या मासिक खर्चाचा प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास ( सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभाग ) तसेच महालेखापाल यांना सादर करावा.

ड) देयकासमवेत जोडण्यात येणाऱ्या संगणक स्लिपमध्ये मुख्य लेखाशिर्ष / गौण शिर्ष / संकेतांक इत्यादि उल्लेख करावा.

४. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणातील अधिकारी / कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच अन्य कार्यालयीन खर्चासाठी मंजूर करण्यात आलेला रु.२१,५०,०००/- ( रुपये एकवीस लाख पन्नास हजार फक्त ) रकमेचा खर्च, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्रमांक : व्ही-२ - २०७० - इतर

प्रशासनिक सेवा (००) इतर प्रशासनिक सेवा (८००) - इतर खर्च (००) (०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (२०७० ०८८२) या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनुमतीने वित्त विभाग, ज्ञापन, क्रमांक : आकनि २०१४/५/अर्थसंकल्प-१३, दिनांक : २०.११.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१४११२६१४५९४४३१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Arun Patil
Date: 2014.11.26 16:21:20 +05'30'

**( संतोष पाटील )**

विशेष कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा /लेखा अनुज्ञेयता), मुंबई.

२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता), नागपूर.

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

६) आयुक्त, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण,महाराष्ट्र राज्य, जुनी मध्यवर्ती इमारत, तळ मजला, ५ बी.जे.रोड, पुणे -१.

७) सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण,महाराष्ट्र राज्य, पुणे-१.

८) सहायक सहकारी निवडणूक अधिकारी,राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.

९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.

१०) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे-५.

११) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१२) संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१३) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१४) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३ / व्यय-२ ),मंत्रालय, मुंबई-३२.

१५) सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

१६) विशेष कार्य अधिकारी, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१७) अवर सचिव (१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१८) निवडनस्ती ( १३ स कार्यासन)